**क्रीडा सुविधा निर्मितीसाठी आर्थिक सहाय्य या योजनेंतर्गत पात्र संस्थांना क्रीडा सुविधा निर्मितीसाठी आर्थिक सहाय्य उपलब्ध करून देण्याच्या प्रस्तावास प्रशासकीय मान्यता देणेबाबत**

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः क्रीडासु-३०२३/प्र.क्र.२६/क्रीयुसे-१**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई ४०० ०३२.
तारीख: २७ एप्रिल, २०२३.

<u>वाचा:-</u>

१) शासन निर्णय,शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, क्र.राक्रीधो-२०१२/प्र.क्र.२६०/क्रीयुसे १, दिनांक ०१ मार्च, २०१४.
२) आयुक्त, क्रीडा व युवक सेवा यांचे पत्र क्र.क्रीसुनि/आर्थिक सहाय्य/२०२१-२२/का-९/२४०,दि.१६.३.२०२२

**प्रस्तावना** :-

राज्य क्रीडा धोरण-२०१२ अंतर्गत शासन निर्णय दिनांक ०१ मार्च,२०१४ अन्वये राज्यातील खाजगी संस्था / शासनामार्फत चालविण्यात येणाऱ्या व राज्य शासनाच्या संबंधित विभागांनी मान्यता दिलेल्या शैक्षणिक संस्था, स्थानिक / नागरी स्वराज्य संस्थांच्या शाळा ( ग्रामपंचायत, नगरपरिषद, महानगरपालिका, जिल्हा परिषद ), विविध खेळांच्या विकासासाठी कार्यरत असणाऱ्या व सार्वजनिक विश्वस्त अधिनियम १९५० किंवा संस्था नोंदणी अधिनियम १८६० अन्वये पंजीबध्द अशा व्यायाम शाळा/ संस्था, क्रीडा मंडळे, क्रीडा संघटना इत्यादींना क्रीडा सुविधा निर्मितीसाठी व क्रीडा साहित्यासाठी “क्रीडा सुविधा निर्मितीसाठी आर्थिक सहाय्य” या योजनेंतर्गत आर्थिक सहाय्य करण्यात येते. त्यानुसार, क्रीडा सुविधा निर्मिती/ क्रीडा साहित्याच्या खरेदीसाठी शासनाने मंजूर केलेल्या अंदाजपत्रकानुसार शासन व संस्था यांचा हिस्सा अनुक्रमे ७५ : २५ टक्के या प्रमाणे निश्चित करण्यात आला आहे. सदर शासन निर्णयानुसार अनुदान मंजुरीसाठी विहित नमुन्यातील अर्ज विहित कागदपत्रासह संबंधित जिल्हा क्रीडा अधिकारी / विभागीय उपसंचालक यांचेमार्फत आयुक्त, क्रीडा व युवक सेवा,पुणे यांच्याकडे सादर करण्यात येतात. तदनंतर सदर प्रस्ताव आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, पुणे यांचेकडून तपासून शिफारशीसह शासनाकडे मान्यतेस्तव सादर केले जातात.

२. क्रीडा सुविधा निर्मीतीसाठी आर्थिक सहाय्यासाठी विविध संस्थांना प्रशासकीय मान्यता देण्याचा प्रस्ताव आयुक्त,क्रीडा व युवक सेवा,म.रा.पुणे यांनी संदर्भाधीन क्र.२ येथील पत्रान्वये शासनास सादर केला आहे. त्यानुसार या योजनेंतर्गत पात्र संस्थेच्या क्रीडा सुविधा निर्मिती प्रकल्पास आर्थिक सहाय्य उपलब्ध करण्याच्या प्रस्तावास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णय :-**

संदर्भाधिन शासन निर्णय दि.०१ मार्च,२०१४ मधील अनुदान मंजुरीच्या पात्रतेच्या व अन्य अटी व शर्तीचे पालन करण्याच्या तसेच प्रकल्पाच्या अंदाजपत्रकीय किंमतीची तपासणी व अन्य अटींच्या अधीन राहून विहित अनुदान मर्यादेचा विचार करता खालील परिशिष्ट-अ मधील पात्र संस्थेच्या स्तंभ-३ येथे नमूद क्रीडा सुविधानिर्मितीसाठीच्या प्रकल्पासाठी स्तंभ-५ नुसार राज्य शासनाच्या विहित अनुदान मर्यादेत (७५%) अर्थसहाय्य उपलब्ध करून देण्याच्या प्रस्तावास तत्वत: प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

**परिशिष्ट-अ**

| अ.क्र. | संस्थेचे नाव | प्रकल्प | शा.नि.दि.१.३.२०१४ अनुसार प्रकलवरील एकूण खर्च मर्यादा | राज्य शासन अनुदान मर्यादा (७५%) | संस्थेचा हिस्सा (२५%) |
|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
| १ | श्री.स्वामी विवेकानंद शिक्षण संस्था,कोल्हापूर संचलित छत्रपती माध्यमिक विद्यालय, वडगाव रासाई, ता. शिरूर, जि.पुणे | बंदिस्त प्रेक्षागृह | १२०.०० लक्ष | ९०.०० लक्ष | ३०.०० लक्ष |

२. उपरोक्त परिशिष्ट-अ येथील संस्थेस वरीलप्रमाणे क्रीडा सुविधा प्रकल्पाकरीता स्तंभ-५ नुसार अनुज्ञेय आर्थिक सहाय्य/ अनुदान हे “मागणी क्र.ई-३. लेखाशिर्ष २२०४, क्रीडा व युवक सेव, १०४ क्रीडा व खेळ, (४०) क्रीडा सुविधा,( ४०) (०१) क्रीडा सुविधा निर्मितीसाठी आर्थिक सहाय्य करणे (कार्यक्रम), ( २२०४-५७०६) ,३१ सहाय्यक अनुदाने (वेतनेत्तर)” या लेखाशिर्षाखाली मंजूर करण्यात यावे.

३. उपरोक्त संस्थेस शासन निर्णयानुसार निश्चित केलेल्या अनुदान वितरणाबाबतच्या अटी/शर्ती तपासून व विहित कार्यपध्दतीनुसार निधी वितरणाबाबतचा प्रस्ताव आयुक्त,क्रीडा व युवक सेवा,महाराष्ट्र राज्य,पुणे

यांनी स्वतंत्रपणे शासनास सादर करावा. सदर प्रस्ताव प्राप्त झाल्यानंतर अर्थसंकल्पित तरतुदीच्या मर्यादेत निधी उपलब्धतेनुसार तसेच वित्त विभागाने वेळोवेळी दिलेल्या वित्तीय निर्देशानुसार निधी वितरणासंदर्भात स्वतंत्रपणे कार्यवाही करण्यात येईल.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०४२७१८१०५१७९२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

RANSING ANANDRAO DERE

Digitally signed by RANSING ANANDRAO DERE
DN: CN = RANSING ANANDRAO DERE, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = SCHOOL EDUCATION AND SPORTS DEPARTMENT
Date: 2023.04.28 17:46:51 +05'30'

**(रणसिंग डेरे)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.राज्यपालांचे सचिव
२. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
३. मा.उपमुख्यमंत्री यांचे सचिव
४. मा.मंत्री, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
५. मा.विरोधी पक्षनेता (विधानसभा / विधानपरिषद) यांचे स्वीय सहायक, मुंबई.
६. सर्व विधानसभा / विधानपरिषद सदस्य यांचे स्वीय सहायक.
७. प्रधान सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
८. आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे,
९. महालेखापाल (लेखा अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१ - मुंबई/महाराष्ट्र-२ नागपूर,
१०.महालेखापाल (लेखा), महाराष्ट्र-१ - मुंबई/महाराष्ट्र-२ नागपूर
११.अधिदान व लेखाधिकारी, मुंबई. (क्रीडा संचालनालयामार्फत)
१२.संबंधित उपसंचालक व जिल्हा क्रीडा अधिकारी (क्रीडा संचालनालयामार्फत),
१३.निवड नस्ती (क्रीयुसे-१).